१३ व्या वित्त आयोगांतर्गतच्या'कोर्ट मॅनेजर (Court Manager)' या घटकाखालील निधीतून राज्यातील न्यायालयांमध्ये कार्यरत कोर्ट मॅनेजरयांच्याकरीता ऑल इन वन संगणक, लॅपटॉप्स व इतर संगणक सामुग्री खरेदी करण्याचा रु.१,१२,७५,०२०/- इतक्या रकमेच्या खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
विधि व न्याय विभाग
शासन निर्णय क्रमांक :- तेविआ-२०२१/प्र.क्र. ३१/कार्या.- सात
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक : ११ नोव्हेंबर, २०२१.

संदर्भ :- १) मा. प्रबंधक. मा. उच्च न्यायालय (वित्त व अर्थसंकल्प), अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र. F.& B. /14 th F.C./७०/२०२०-२१,दिनांक १६.०२.२०२१.
२) मा. प्रबंधक. मा. उच्च न्यायालय (वित्त व अर्थसंकल्प), अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र. F.& B/14 th F.C./५९/२०२१-२२,दिनांक २२.१०.२०२१ .
३) दि.०९.११. २०२१ रोजी घेण्यात आलेल्या उच्चस्तरीय संनियत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना :-

राज्यातील न्यायालयांमध्ये कार्यरत कोर्ट मॅनेजर यांच्याकरीता ऑल इन वन संगणक, लॅपटॉप्स व इतर संगणक सामुग्री खरेदी करण्याकरीता येणारा रु.१,१२,७५,०२०/- इतका खर्च१३ व्या वित्त आयोगातील 'कोर्ट मॅनेजर (Court Manager)' या घटकाखालील अखर्चित निधीतून भागविण्याबाबतचा प्रस्ताव मा. प्रबंधक. मा. उच्च न्यायालय (वित्त व अर्थसंकल्प), अपील शाखा, मुंबई यांनी संदर्भ क्र. १ व २ अन्वये शासनास सादर केला होता. सदर प्रस्ताव मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सनियंत्रण समितीच्या दि.०९.११.२०२१ रोजीच्या बैठकीमध्ये मान्यतेस्तव सादर करण्यात आला असता, त्यास उच्चस्तरीय सनियंत्रण समितीने मान्यता दिली आहे. त्यानुसार, सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

राज्यातील न्यायालयांमध्ये कार्यरत कोर्ट मॅनेजर यांच्याकरीता ऑल इन वन संगणक, लॅपटॉप्स व इतर संगणक सामुग्री खरेदी करण्याकरीता रु.१,१२,७५,०२०/- (अक्षरी रु. एक कोटी बारा लक्ष पंच्याहत्तर हजार वीस फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. १३ व्या वित्त आयोगांतर्गत अखर्चित निधीमधून ऑल इन वन संगणक, लॅपटॉप्स व इतर संगणक सामुग्री खरेदी करण्याचा प्रस्तावाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| Sr. No. (A) | Hardware (B) | Quantity (C) | Cost (E) | Total (E=C X E) |
|---|---|---|---|---|
| 1. | All in One Computer | 45 | 76,000/- | 34,20,000/- |
| 2. | Laptop | 45 | 80,000/- | 36,00,000/- |
| 3. | Microsoft Office | 45 x 2 | 33,430/- | 30,08,700/- |
| 4. | Printer | 45 | 22,497/- | 10,12,365/- |
| 5. | External Portable Hard Disk | 45 | 5199/- | 2,33,955/- |
| | | | **Total** | **1,12,75,020/-** |

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च हा "मागणी क्र. जे-१, २०१४, न्यायदान, ८००, इतर खर्च (००) (०२) न्यायदानात अधिक सुधारणा करण्यासाठी१३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार अनुदान (केंद्रीय सहाय्य) (२०१४ ०४५९)" या लेखाशिर्षातील "१७ -संगणक खर्च" या उद्दिष्टाखाली मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय दिनांक ०९.११.२०२१ रोजीच्या मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय संनियत्रण समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर खरेदी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक२४.०८.२०१७ व ०८.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार Gem Portal वरुन करण्यात यावी.

६. यानुषंगाने निधीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११११११७२५२१५९१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2021.11.11 17:28:06 +05'30'

**( नितीन वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति,**

१) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२) प्रबंधक (वित्त व अर्थसंकल्प), उच्च न्यायालय, मुंबई,
३) महालेखापाल -१/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
६) वित्त विभाग व्यय-५ ,
७) कार्यासन अधिकारी (कार्या. २३/२४/२५), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) निवडनस्ती-का. ७.